GR 200404071021 33001 - 0100

विभागीय चौकशा त्वरेने पूर्ण करण्यासाठी पदांचे हस्तांतरण.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक:सीडीआर-1195/प्र.क्र.24/11-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक : 22 जून 1995.

**पहा :** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीडीआर-1187/1581/45/11, दिनांक 29 डिसेंबर, 1988.

**शासन निर्णय** : राज्यातील वर्ग-3 व वर्ग-4 च्या कर्मचा-याविरुध्द प्रलंबित असलेल्या विभागीय चौकशांच्या कामात सुसूत्रता आणण्याच्या दृष्टीने प्रत्येक जिल्ह्यातील अशा चौकशा चालविण्यासाठी जिल्हानिहाय 29 जिल्हा चौकशी अधिका-यांची पदे खालील दुय्यम कर्मचा-यांसह दिनांक 1 जानेवारी, 1989 पासून निर्माण करण्यात आलेली आहेत.

| | | |
|---|---|---|
| एक) | जिल्हा चौकशी अधिकारी (तहसिलदार) – (रु.2000-60-2300-द.रो.75-3200-100-3500) | 29 |
| दोन) | अव्वल कारकून (रु.1400-40-1800-द.रो.50-2300) | 29 |
| तीन) | लिपिक-टंकलेखक (950-20-1150-द.रो.25-1500) | 29 |
| चार) | लघुटंकलेखक (रु.1200-30-1560-द.रो.40-2040) | 29 |

2. या 29 जिल्हा चौकशी अधिका-यांची विभागणी पुढीलप्रमाणे करण्यात आलेली आहे. मुंबई व नागपूर या जिल्ह्यासाठी प्रत्येकी 2 अधिकारी, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या तीन जिल्ह्यांसाठी मिळून 1 अधिकारी (मुख्यालय रत्नागिरी) लातूर आणि उस्मानाबाद या दोन जिल्ह्यांसाठी मिळून 1 अधिकारी (मुख्यालय उस्मानाबाद) आणि उर्वरित 23 जिल्ह्यांसाठी प्रत्येकी एक अधिकारी (या अधिका-यांचे मुख्यालय त्या त्या जिल्ह्याच्या मुख्यालयी ). हे सर्व अधिकारी त्या त्या जिल्ह्याच्या जिल्हाधिकारी कार्यालयाशी संलग्न आहेत.

3. या सर्व जिल्हा चौकशा अधिका-यांकडे प्रलंबित असलेल्या विभागीय चौकशी प्रकरणांचा आढावा घेतला असता असे निदर्शनास आले की, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या विभागीय चौकशी प्रकरणांची संख्या बरीच जास्त आहे व जिल्हा चौकशी अधिकारी सातारा, नांदेड व बुलढाणा यांच्याकडे प्रलंबित असलेल्या प्रकरणांची संख्या अत्यल्प आहे. मुंबई येथे प्रलंबित असलेल्या विभागीय चौकशा प्रकरणांचा जलद निपटारा होण्याच्या दृष्टीने शासनाने असा निर्णय घेतला आहे की, जिल्हा चौकशी अधिकारी सातारा, नांदेड व बुलढाणा यांची पदे दुय्यम कर्मचा-यांच्या पदांसह दिनांक 1.8.95 पासून एक वर्षासाठी मुंबई येथे हस्तांतरित करावीत. त्यानुसार 1 ऑगस्ट 1995 पासून 29 जिल्हा चौकशी अधिका-यांची विभागणी पुढीलप्रमाणे राहील.

| | |
|---|---|
| मुंबई जिल्ह्यासाठी एकूण | 5 जिल्हा चौकशी अधिकारी; |
| नागपूर जिल्ह्यासाठी एकूण | 2 जिल्हा चौकशी अधिकारी; |
| रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या 3 जिल्ह्यांसाठी मिळून | 1 जिल्हा चौकशी अधिकारी (मुख्यालय रत्नागिरी) |
| लातूर व उस्मानाबाद या 2 जिल्ह्यांसाठी मिळून | 1 जिल्हा चौकशी अधिकारी (मुख्यालय उस्मानाबाद) |
| सातारा व सांगली या 2 जिल्ह्यांसाठी मिळून | 1 जिल्हा चौकशी अधिकारी (मुख्यालय सांगली) |
| नांदेड व परभणी या 2 जिल्ह्यांसाठी मिळून | 1 जिल्हा चौकशी अधिकारी (मुख्यालय परभणी) |
| बुलढाणा व अकोला या 2 जिल्ह्यांसाठी मिळून | 1 जिल्हा चौकशी अधिकारी (मुख्यालय अकोला) |
| उर्वरित 17 जिल्ह्यांसाठी प्रत्येकी 1 या प्रमाणे | 17 जिल्हा चौकशी अधिकारी (मुख्यालय संबंधित जिल्ह्याच्या मुख्यालयी) |

4. जिल्हा चौकशी अधिकारी, विभागीय चौकशा, जिल्हा सातारा, नांदेड व बुलढाणा यांनी त्यांच्याकडे असलेल्या विभागीय चौकशी प्रकरणांचे सर्व कागदपत्र अनुक्रमे जिल्हा चौकशी अधिकारी, विभागीय चौकशी सांगली, परभणी व अकोला यांच्याकडे हस्तांतरित करावेत व त्याचवेळी ह्या हस्तांतरणाबाबत संबंधित शिस्तभंग प्राधिका-यांनाही कळवावे

कृ.मा.प.

आणि त्याना अशी विनती करण्यात यावी की त्यानी संबंधित प्रकरणात चौकशी अधिकारी म्हणून संबंधित जिल्हा चौकशी अधिकारी, विभागीय चौकशा, यांच्या नेमणुका करण्याचे आदेश विनाविलंब निर्गमित करावेत. तथापि जिल्हा चौकशी अधिकारी, सातारा, नांदेड, बुलढाणा यांनी त्यांच्याकडील प्रकरणांपैकी ज्या प्रकरणात चौकशी प्रकरणाचे सर्व टप्पे पूर्ण केले असून केवळ चौकशी अहवाल लिहिण्याचे काम बाकी असेल अशी प्रकरणे हस्तांतरित करु नयेत. अशा प्रकरणात चौकशी अहवाल सादर करण्याचे काम त्यांनीच दिनांक 31 जुलै, 1995 पूर्वी पूर्ण करावे.

5. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-473/व्यय-4, दिनांक 7.4.1995 अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अ. ग. मंडपे,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे सचिव, मुंबई,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मुंबई,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मुंबई,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
महसूल व वन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-25, कार्यासन-22,
प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशी, कोकण विभाग, मुंबई,
प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशा, पुणे विभाग, पुणे,
प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशा, नागपूर विभाग, नागपूर,
प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशा, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद,
प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशा, नाशिक विभाग, नाशिक,
प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशा, अमरावती विभाग, अमरावती,
सर्व जिल्हा चौकशी अधिकारी, विभागीय चौकशा, द्वारा सर्व जिल्हाधिकारी कार्यालये,
महालेखापाल-1(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-1(लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2(लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग (अर्थसंकल्प-13, व्यय-4),
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख,
निवड नस्ती.